**सेवानिवृत्तीनंतर शासकीय निवासस्थाने कुटुंबियांच्या नावे करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक शानिवा-१९/२०००/प्र.क्र.२२६/२०००/२३-अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १२ जून, २०००

संदर्भ: १) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.एसीडी २५८४/सीआर-२९६/२३-अ दि. ३१ डिसेंबर १९८४
२) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.शानिवा-२५८६/प्र.क्र.६३/८६/२३-अ दि. २७ सप्टेंबर १९९९

**शासन निर्णयः-**

बृहन्मुंबईतील विविध शासकीय कार्यालयांमध्ये काम करणा-या कर्मचा-यांना शासकीय निवासस्थानाचे वाटप केले जाते. असे कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या नावे वाटप करण्यात आलेले शासकीय निवासस्थान त्यांच्या कुटुंबातील शासन सेवेमध्ये असलेल्या व्यक्तिच्या नावे करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.एसीडी २५८४/सीआर-२९६/२३-अ दि. ३१ डिसेंबर १९८४ अन्वये घेण्यात आला आहे. तसेच शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.शानिवा-२५८६/प्र.क्र.६३/८६/२३-अ दि. २७ सप्टेंबर १९९९ अन्वये शासकीय निवासस्थान मिळालेला कर्मचारी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या समवेत राहणा-या त्याच्या कुटुंबातील व्यक्तीची लोकसेवा आयोगामार्फत अथवा सेवाप्रवेश नियमानुसार विहित मार्गाने नियमित नियुक्ती झाली असून कमीत कमी एक वर्षाची सलग सेवा झाली असल्यास सदर परिपत्रकातील अटींच्या अधीन राहून संबंधित व्यक्तिच्या नावे वाटप झालेले निवासस्थान सेवेतील कुटुंबिय व्यक्तीच्या नावावर करण्यात यावे असे आदेश आहेत. तथापि संबंधित कर्मचा-यांच्या सेवानिवृत्तीनंतर शासन सेवेत असलेल्या कुटुंबिय व्यक्तीच्या नावे निवासस्थान वर्ग करण्याच्या संदर्भात आदेश नसल्यामुळे अशा कुटुंबिय व्यक्तीच्या नावे निवासस्थान वर्ग करण्यात येत नाही.

२. शासकीय कर्मचारी वसाहत, वांद्रे येथे सेवानिवृत्तीनंतर अनधिकृतपणे वास्तव्य करीत असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना शासकीय निवासस्थानातून निष्कासित करण्यास दि.३१ मे, १९९८ पर्यन्त स्थगिती देण्यात आली होती. तसेच, शासन पत्र क्र.शानिवा-१५९३/मुमं ६३/प्र.क्र.३३५९३/२३-अ, दि.११ नोव्हेंबर, ९४ अन्वये प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीनंतरचा अनुज्ञेय कालावधी वगळता आर्थिक दराच्या दुप्पट दराने भाडे आकारणी करण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी वा त्यांच्या वारसांकडून आर्थिक दराच्या दुप्पट दराने भाडे आकारणी करण्यात येत आहे. शासकीय कर्मचारी वसाहत, वांद्रे येथे सेवानिवृत्तीनंतर अनधिकृतपणे वास्तव्य करीत असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या ताब्यातील निवासस्थाने रिक्त करुन घेण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सेवानिवृत्त कर्मचा-यांना शासकीय निवासस्थानातून निष्कासित करण्यास दि.३१ मे, १९९८ पर्यन्त असलेली स्थगिती लक्षात घेऊन शासन निर्णय शानिवा-१०९५/प्र.क्र.८०७/९५/२३-अ, दि.१० सप्टेंबर, १९९६ मधील तरतूदी अन्वये दि.१ जून, १९९८ पासून प्रति चौ.फूट.रु.१० या दराने दंडनीय भाडे आकारुन निवासस्थाने रिक्त करुन घेण्यात येत आहेत. निष्कासित करण्यास शासनाच्या असलेल्या स्थगिती कालावधीत सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या कुटुंबातील व्यक्ती राज्य शासनाच्या

सेवेत लागलेल्या आहेत. शासन सेवेत लागलेल्या कुटुंबिय व्यक्तीने त्यांच्या पालकांच्या नांवे वाटप झालेले निवासस्थान पाल्याच्या नांवे हस्तांतरीत करण्याची मागणी केली आहे. या मागणीचा विचार करुन दि.३१ मार्च, २००० पूर्वी शासन सेवेत लागलेल्या कुटुंबिय व्यक्तीच्या नावे त्यांच्या अनुज्ञयतेनुसार एक विशेष बाब म्हणून खालील अटींच्या अधीन राहून निवासस्थान वर्ग करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

१. कुटुंबिय व्यक्तीची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोग किंवा विहित मार्गाने नियमित स्वरुपात झालेली असावी.

२. संबंधित कुटुंबिय व्यक्ती ही सेवानिवृत्त कर्मचा-याच्या कुटुंबाचा घटक म्हणून त्याच्यासोबत शासकीय निवासस्थानात राहणारी असावी.

३. अशा कुटुंबिय व्यक्तीला घरभाडे भत्ता अनुज्ञेय राहणार नाही. संबंधीत निवासस्थान तिच्या नावावर करण्यापूर्वी अशा कुटुंबिय व्यक्तीला घरभाडे भत्ता प्रदान करण्यात आलेला नाही अशा आशयाचे प्रमाणपत्र तिच्या कार्यालय प्रमुखामार्फत सादर करणे बंधनकारक राहील.

४. मूळ वाटपदार/कुटुंबिय व्यक्ती हयांनी निवासस्थानाचा गैरवापर केल्याने यांच्याविरुध्द निष्कासनाची कार्यवाही प्रस्तावित/सुरु केलेली नाही अथवा थकबाकीदार नाही असे प्रमाणपत्र संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करणे आवश्यक राहील.

५. सेवानिवृत्तीनंतर स्वतःची राहण्याची अन्यत्र व्यवस्था केलेल्या कर्मचा-यांच्या कुटुंबिय व्यक्तीस शासकीय निवासस्थान त्यांच्या नांवे वर्ग करण्यास पात्र समजली जाणार नाही.

६. सेवानिवृत्तीनंतरचा तीन महिन्याचा अनुज्ञेय कालावधी वगळता कुटुंबिय व्यक्तीच्या नावे निवासस्थान वर्ग होईपर्यंतच्या कालावधीसाठी शासन पत्र क्रमांकः शानिवा-१५९३/मुंमं-६३/ प्रकरण क्र.३३५/९३/२३-अ, दिनांक ११ नोव्हेंबर १९९४ नुसार आर्थिक दराच्या दुप्पट दराने भाडे आकारण्यात यावी.

७. ही सवलत शासकीय कर्मचारी वसाहत, वांद्रे पुरतीच मर्यादित राहील.

८. दिनांक ३१ मार्च २००० नंतर या सवलतीचा लाभ दिला जाणार नाही

३. सर्व मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबईतील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना वरील निर्णय त्यांच्या नियंत्रणाखालील काम करणा-या अधिकारी/कर्मचा-यांच्या निर्देशनास आणुन द्यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-सीआर-२९६/२०००/सेक-५ दिनांक २६ मे, २००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

(विनय नाहटा)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
४. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. राज्यपालांचे सचिव,
८. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
९. उप मुख्यमंत्र्याचे सचिव,
१०. अधिक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई,
११. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई,
१२. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, वरळी, मुंबई-४०० ०१८,
१३. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई जुने जकात घर, मुंबई-४०० ०२३,
१४. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई, अंधेरी, मुंबई-४०० ०५८,
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने)
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने)
१७. प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई (पत्राने)
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,
२०. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-४०० ०३२.
२१. सर्व मंत्रालयीन विभाग.
२२. सर्व विभागीय आयुक्त.
२३. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
२४. निवड नस्ती.